महाराष्ट्र-कर्नाटक सीमाप्रश्न आंदोलनातील हुतात्म्यांच्या वारसांना निवृत्तीवेतन व इतर आर्थिक लाभ...
वित्तीय वर्ष २०२३-२०२४ मधील एप्रिल,मे व जून २०२३ या महिन्यांकरिता अनुदानाचे वाटप.

# महाराष्ट्र शासन

## सामान्य प्रशासन विभाग

**शासन निर्णय, क्रमांक : बियुडी-१८२३/प्र.क्र.४१/२०२३/३६**

मंत्रालय, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १६ मे, २०२३

**संदर्भ :-**

१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. बियुडी-१८१४/प्र.क्र.९६/२०१४/३६, दि.२१.०४.२०१५,
२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. बियुडी-१८१४/प्र.क्र.९६/२०१४/३६, दि.३१.०१.२०२३,
३) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२.०४.२०२३,
४) शासन पत्र, सामान्य प्रशासन विभाग, क्र. अर्थसं-२०२३/प्र.क्र.२२/२०२३/२५, दि.१७.०४.२०२३.

**शासन निर्णय :-** "महाराष्ट्र विनियोजन विधेयक, २०२३" (महाराष्ट्र विनियोजन अधिनियम,२०२३) च्या अधिसूचीतील स्तंभ क्र.४ मध्ये विनिर्दिष्ट करण्यात आलेल्या रकमांस विधानमंडळाने मंजूरी दिली असून महाराष्ट्राचे राज्यपाल यांनी त्यास अधिसंमती दिलेली आहे आणि ते २०२३ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक १७ म्हणून, महाराष्ट्र राजपत्र असाधारण भाग-४, दिनांक २९ मार्च, २०२३ मध्ये प्रसिध्द केले आहे. त्यानुसार उपरोक्त संदर्भाधीन क्र. ३ च्या परिपत्रकान्वये सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाच्या अनिवार्य व कार्यक्रम खर्चासाठी, एप्रिल ते जून,२०२३ या पहिल्या तिमाहीकरिता २०%, जुलै ते सप्टेंबर,२०२३ करिता २० % व ऑक्टोबर ते डिसेंबर,२०२३ या तिमाहीसाठी ३० % याप्रमाणे एकूण वार्षिक तरतूदीच्या ७० % च्या मर्यादेत खर्च भागविता यावा यासाठी विविध लेखाशिर्षाखाली निधी वितरित करण्यात आला आहे.

२. "मागणी क्र. ए-५, २२३५ - सामाजिक सुरक्षा व कल्याण, ६०-इतर सामाजिक सुरक्षा व कल्याण कार्यक्रम - १०२ - सामाजिक सुरक्षा योजनेखाली निवृतीवेतन- (००) (०३) महाराष्ट्र-कर्नाटक सीमा आंदोलनातील हुतात्म्यांच्या वारसांना निवृत्तीवेतन (२२३५ २४९३)" या लेखाशीर्षाखाली सन २०२३-२०२४ या वित्तीय वर्षासाठी एकूण रु.१६,३२,०००/- एवढी अर्थसंकल्पीय तरतूद मंजूर करण्यात आलेली आहे. शासनाने दि.२२.११.२०२२ च्या शासन निर्णयान्वये राज्य शासनामार्फत स्वातंत्र्य सैनिकांना देण्यात येणाऱ्या रु.१०,०००/- इतक्या निवृत्तीवेतनात रु.१०,०००/- ने वाढ करुन रु.२०,०००/- दरमहा इतके निवृत्तीवेतन दि.०१.११.२०२२ पासून पूर्वलक्षी प्रभावाने लागू करण्याबाबत निर्णय घेतलेला आहे. त्याच धर्तीवर महाराष्ट्र कर्नाटक आंदोलनातील हुतात्म्यांच्या वारसांच्या निवृत्तीवेतनात वाढ करण्याबाबतचा संदर्भाधीन क्र.२ वरील दि.३१.०१.२०२३ रोजीचा शासन निर्णय मंजूर केला आहे.

३. वित्त विभागाने दि.१२.०४.२०२३ रोजी महाराष्ट्र विनियोजन अधिनियम, २०२३ निधी वितरणाबाबतचे परिपत्रक निर्गमित केले आहे. या परिपत्रकातील तरतुदीनुसार वित्त विभागाने अर्थसंकल्प

वितरण प्रणालीवर (बिम्स) एप्रिल,मे व जून, २०२३ साठी रु. ८,६४,९६०/- इतकी तरतूद वितरीत केलेली आहे.

४. महाराष्ट्र-कर्नाटक सीमा आंदोलनातील १३ हुतात्म्यांच्या लाभार्थ्यांना प्रत्येकी रु.२०,०००/- दरमहा निवृत्तीवेतन, वार्षिक रु.५००/- प्रवास भत्ता व आकस्मिक मदत रु. ५,०००/- याप्रमाणे संदर्भ क्र. २ येथील दिनांक ३१.०१.२०२३ च्या शासन निर्णयान्वये अनुज्ञेय आहे. सबब, प्राप्त अनुदानातून माहे एप्रिल,मे व जून, २०२३ या तीन महिन्याचा खर्च भागविण्याकरिता रु. ८,०६,५००/- इतके अनुदान महाराष्ट्र-कर्नाटक सीमा आंदोलनातील हुतात्म्यांच्या वारसांना निवृत्तीवेतन व वार्षिक प्रवास भत्ता व अन्य अनुषंगिक लाभ वार्षिक रु.५,०००/- अदा करण्यासाठी संबंधीत जिल्हाधिकारी यांना पुढील तक्त्यात नमूद केल्याप्रमाणे मागणी क्र. ए-५, २२३५ - सामाजिक सुरक्षा व कल्याण, ६०-इतर सामाजिक सुरक्षा व कल्याण कार्यक्रम - १०२ सामाजिक सुरक्षा योजनेखाली निवृतीवेतन- (००) (०३) महाराष्ट्र-कर्नाटक सीमा आंदोलनातील हुतात्म्यांच्या वारसांना निवृत्तीवेतन (२२३५ २४९३)" या लेखाशिर्षाखाली वितरित करण्यात येत आहे :

| **अ. क्र.** | **जिल्हाधिकारी कार्यालयाचे नाव (लाभार्थ्यांची संख्या)** | **एप्रिल, मे व जून,२०२३ या तीन महिन्यांसाठी उपलब्ध तरतुदीतून वितरित करावयाचे अनुदान** | | | |
|---|---|---|---|---|---|
| | | निवृत्तीवेतन (दरमहा रु.२०,०००/- प्रत्येकी) | प्रवासभत्ता (प्रत्येकी रु.५००/- वार्षिक) | **अन्य अनुषंगिक लाभ** रु.५,०००/- प्रत्येकी (वार्षिक) | एकूण **वितरीत** अनुदान |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | मुंबई शहर (३) | १,८०,००० | १,५०० | ५,००० | १,८६,५०० |
| २ | कोल्हापूर (८) | ४,८०,००० | ४,००० | ५,००० | ४,८९,००० |
| ३ | पुणे (१) | ६०,००० | ५०० | ५,००० | ६५,५०० |
| ४ | रत्नागिरी (१) | ६०,००० | ५०० | ५,००० | ६५,५०० |
| एकूण अनुदान | | **७,८०,०००** | **६,५००** | **२०,०००** | ८,०६,५०० |

**५. सदर लेखानुदान पुढील अटींच्या अधीन राहून वितरीत करण्यात येत आहे :-**

१) एप्रिल,मे व जून, २०२३ या ३ महिन्यांचा खर्च संबंधित जिल्हाधिकारी यांनी त्यांना वितरीत केलेल्या तरतुदीइतक्या मर्यादेत ठेवावा.

२) संबंधित जिल्हाधिकारी यांनी उक्त बाबीवर होणाऱ्या खर्चाची वेगळी नोंद ठेवून महालेखापाल कार्यालयामधील खर्चाच्या नोंदीशी ताळमेळ घालून त्याचे विवरणपत्र सामान्य प्रशासन विभाग/ कार्यासन-२५ व वित्त विभाग यांच्याकडे विहित मुदतीत पाठवावे व त्याची प्रत या कार्यासनासदेखील पाठवावी. तसेच कुठल्याही परिस्थितीत "२२३५२४९३" या लेखाशीर्षाखालीच या रकमा खर्ची पडत असल्याची व त्याबाबत त्या त्या महिन्यात खर्चमेळाद्वारे खातरजमा करण्याची जबाबदारी संबंधित जिल्हाधिकारी यांची राहील.

३) **जिल्हाधिकारी, मुंबई शहर व पुणे** यांनी एप्रिल,२०२३ ते जून,२०२३ या तीनही महिन्यात अधिदान व लेखाधिकारी या कार्यालयाशी त्या-त्या महिन्यात संपर्क साधून बीम्स प्रणालीवर नमूद खर्च खर्ची पडत असल्याची खातरजमा करुन तसे प्रमाणपत्र प्रत्येक महिन्याच्या १० तारखेच्या आत GAD-362@maharashtra.gov.in या ई-मेल वर पाठविण्याची जबाबदारी या कामाशी संबंधीत तहसिलदार यांची राहील.

६. हा शासन निर्णय, वित्त विभागाचे परिपत्रक अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२.०४.२०२३ व सामान्य प्रशासन विभागाचे पत्र क्र. अर्थसं-२०२३/प्र.क्र.२२/२०२३/२५, दि.१७.०४.२०२३ मधील सूचना विचारात घेऊन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२३०५१७११४६२३६७०७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

AVINDRA BHIKAJI MORYE

Digitally signed by AVINDRA BHIKAJI MORYE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=01344b08f37ac02e8488c61c468208e8d69a843917e75fef2893df71cca b0faf, pseudonym=32A2EAE514431321A37494EC2A2ADF914E132F7C, serialNumber=66EC84B6738FF47B21428AD5C3E86ED22C64FDE22957E48F88 5E1AB329C2660E, cn=AVINDRA BHIKAJI MORYE
Date: 2023.05.17 11:48:02 +05'30'

**(अ. भि. मोरये)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत, माहिती व आवश्यक कार्यवाहीसाठी रवाना :-**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) / महालेखापाल (लेखा परीक्षा) , महाराष्ट्र- १, मुंबई.
२. संचालक, लेखा व कोषागारे (संगणक शाखा), मुंबई.
३. प्रधान सचिव (व्यय) / लेखा व कोषागरे, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. जिल्हाधिकारी, मुंबई शहर जिल्हा, जुने जकात गृह, फोर्ट, मुंबई-२३.
५. जिल्हाधिकारी, रत्नागिरी, पुणे व कोल्हापूर.
६. जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर जिल्हा, वांद्रे (पूर्व(, मुंबई-५१ यांना असे कळविण्यात येते की, त्यांना आवश्यक असलेले अनुदान जिल्हाधिकारी, मुंबई शहर यांच्याकडून मागविण्यात यावे.
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
८. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
९. जिल्हा कोषागार अधिकारी, रत्नागिरी, पुणे व कोल्हापूर.
१०. सामान्य प्रशासन विभाग / कार्यासन-२५, मंत्रालय, मुंबई.
११. निवड नस्ती (कार्या.३६).